भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता कार्यक्रम दि.०६.०४.२०२२ ते दि.१६.०४.२०२२

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक : सान्यावि-२०२२/प्र.क्र.७८/बांधकामे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०५ एप्रिल, २०२२.

**प्रस्तावना :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भारतीय राज्यघटनेद्वारे देशाला समता, स्वातंत्र्य व बंधुत्व या त्रयीने समाजामध्ये एकात्मता निर्माण करण्याचा प्रयत्न केलेला आहे. राज्य घटनेच्या कलम ४६ मध्ये घटनेने समाजातील दुर्बल वंचितांबाबत राज्याची जबाबदारी अत्यंत दुरदर्शीपणाने व गांभीर्याने नमूद केलेली आहे. कलम ४६ मध्ये "राज्य हे दुर्बलतर जनवर्ग आणि विशेषत: अनुसूचित जाती व अनुसूचित जनजाती यांचे विशेष काळजीपूर्वक शैक्षणिक व आर्थिक हितसंवर्धन करील आणि सामाजिक अन्याय व सर्व प्रकारचे शोषण यापासून त्यांचे संरक्षण करेल." असे नमूद करण्यात आले आहे. वरील निर्देशांचे अनुषंगाने अनुसूचित जाती व सर्व प्रकारचे पीड़ीत शोषित असलेल्यांना सामाजिक न्याय, आर्थिक व सामाजिक संरक्षण उपलब्ध करून देण्याबाबत राज्य सरकार सातत्याने प्रयत्न करीत आहे. त्याअनुषंगाने अनुसूचित जाती, वंचित दुर्बल घटकांच्या सर्वांगीण विकासाचे ध्येय म्हणून विविध कल्याणकारी योजना राज्यभर राबविण्यात येत आहेत. या सर्व योजनांची माहिती सर्वसामान्य जनतेला व्हावी तसेच त्याचे उद्देश साध्य व्हावेत, या करीता राज्यात "भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता कार्यक्रम साजरा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यात "भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता कार्यक्रम" दिनांक ६ एप्रिल, २०२२ ते १६ एप्रिल, २०२२ या कालावधीत साजरा करण्याचा निर्णय, या शासन निर्णयान्वये घेण्यात येत आहे. राज्यातील सर्व प्रशासकीय विभागाच्या कार्यालयांना खाली नमूद केल्याप्रमाणे या कार्यक्रमाचे आयोजन करण्याचे निर्देश या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | दि. | आयोजित करावयाचा कार्यक्रम | अंमलबजावणी करणारी यंत्रणा |
|---|---|---|---|
| १ | ६.०४.२०२२ | सामाजिक समता कार्यक्रमाचे उदघाटन करणे व पत्रकार परिषदेचे आयोजन करणे.<br>सामाजिक समता कार्यक्रमनिमित्त कार्यक्रमांची माहिती देणे. | सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा |
| २ | ०७.०४.२०२२ | विभागातील सर्व महाविद्यालय, आश्रमशाळा, शासकीय वसतिगृह, निवासी शाळा येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे विचांरावर आधारीत वक्तृत्व स्पर्धा, निबंध स्पर्धा, लघुनाट्य स्पर्धा इत्यादीचे आयोजन | सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | ०८.०४.२०२२ | जिल्हा स्तरावर व विभागीय स्तरावर कार्यक्रमाचे आयोजन. स्वाधार शिष्यवृत्ती मिनी ट्रॅक्टर लाभार्थ्यांना प्रतिनिधिक वाटप | सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा |
| ४ | ०९.०४.२०२२ | प्रत्येक जिल्ह्यात जेष्ठ नागरिकांचे जनजागृती शिबीर व नागरिकांचा मेळावा घेणे.<br>जिल्हयात जिल्हा आरोग्य अधिकारी यांच्या सहकार्याने विभागातील सर्व महाविद्यालय, आश्रमशाळा, शासकीय वसतिगृह, निवासी शाळा येथे रक्तदान शिबीराचे आयोजन | सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा |
| ५ | १०.०४.२०२२ | विभागामध्ये समतादूतांमार्फत ग्रामीण व शहरी भागात पथनाट्य व लघुनाटिका या द्वारे सामाजिक न्याय विभागाच्या विविध योजनांबाबत जनतेचे प्रबोधन करणे | सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा |
| ६ | ११.०४.२०२२ | महात्मा फुले जयंती साजरी करणे, महात्मा फुले यांचे सामाजिक कार्य या विषयी वक्ता बोलवून कार्यक्रम घेणे | सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा |
| ७ | १२.०४.२०२२ | सहाय्यक आयुक्त समाज कल्याण यांचे मार्फत प्रत्येक जिल्हयात मार्जिन मनी योजनेंतर्गत कार्यशाळा आयोजित करणे, मार्जिन मनी योजनेचा लाभ घेतलेल्या लाभार्थ्यांची कार्यशाळा आयोजित करणे | सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा व जिल्हा जात पडताळणी यंत्रणा, संबंधित जिल्हा |
| ८ | १३.०४.२०२२ | संविधान जागर- संविधान जनजागृतीसाठी कार्यक्रम आयोजित करणे | सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा |
| ९ | १४.०४.२०२२ | १. सामाजिक न्याय विभागांतर्गत अधिनस्त सर्व शासकीय कार्यालय, महाविद्यालय, निवासी शाळा, आश्रमशाळा येथे भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना अभिवादन व इतर कार्यक्रम व्याख्यान, चर्चासत्र इ. सदर कार्यक्रमास संबंधित सर्व लोकप्रतिनिधींना उपस्थित राहणे बाबत आमंत्रण.<br>२. जिल्हास्तरावर दादासाहेब गायकवाड सबळीकरण | १ व २ सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा<br>३. जिल्हा जात पडताळणी यंत्रणा, |

| | | | |
|---|---|---|---|
| | | व स्वाभिमान मेळावा आयोजित करतांना बाबासाहेबांनी शेतकऱ्यांसाठी केलेल्या कार्याबद्दल माहिती सांगणारे व्याख्यान आयोजित करणे.<br>३. सदर दिवशी विभागातील सर्व जिल्हा जात पडताळणी कार्यालयात Online-Validity प्रमाणपत्र प्रदान करणे. | संबंधित जिल्हा |
| १० | १५.०४.२०२२ | प्रत्येक सहाय्यक आयुक्त कार्यालयात महिला मेळावा घेऊन बाबासाहेबांनी महिलांसाठी केलेल्या कार्याबद्दल माहिती देणारे व्याख्यान आयोजित करणे.<br>विभागात सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचेमार्फत तृतीयपंथी व्यक्तीमध्ये जनजागृती व ओळखपत्र वाटप कार्यक्रम. | सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा |
| ११ | १६.०४.२०२२ | ग्रामीण व शहरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द वस्त्यांमध्ये स्वच्छता करणे व अनुसूचित जाती व नवबौध्द वस्ती सुधार लाभार्थ्यांचे मनोगत कार्यक्रम आणि समता कार्यक्रम समारोप. | सहाय्यक आयुक्त व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, संबंधित जिल्हा |

२. सदर कार्यक्रमाच्या आयोजनाची संपूर्ण जबाबदारी त्या त्या जिल्हयातील सहाय्यक आयुक्त,समाजकल्याण यांची राहील व कार्यक्रमाची काटेकोर अंलबजावणी करण्यासाठी पर्यवेक्षणाची जबाबदारी संबंधित उपायुक्त, समाजकल्याण यांची राहील.

३. “भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता कार्यक्रम साजरा करताना ग्रामपंचायत, स्थानिक स्वराज्य संस्था, महानगर पालिका वा राज्य निवडणूक आयोगाने घोषित/लागू केलेल्या अन्य कोणत्याही निवडणूक/ पोटनिवडणूकीची आदर्श आचारसंहितेचा भंग होणार नाही, याची सर्व संबंधितांनी दक्षता घ्यावी.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४०५१८१५४९९५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUCTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2022.04.05 18:16:25 +05'30'

**(अ.कों.अहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त, महसुली विभाग
७) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
८) सर्व जिल्हाधिकारी
९) महासंचालक डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण केंद्र, पुणे
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनाय, मंत्रालय, मुंबई
११) संचालक, महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१२) व्यवस्थापकीय संचालक, साहित्यरत्न लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१३) व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१५) अध्यक्ष, सर्व जिल्हा जात पडताळणी समिती
१६) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१७) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
१८) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद.
१९) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर.
२०) निवासी लेखा परिक्षक, मुंबई/ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२२) सर्व सह / उपसचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी, सा.न्या. व.वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई
२३) निवडनस्ती/बांधकामे.